जून ते ऑक्टोबर,२०२० या कालावधीत राज्यातील विविध जिल्हयांमध्ये अतिवृष्टी व पुरामुळे बाधित झालेल्या नागरिकांना मदत देण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: सीएलएस-२०२०/प्र.क्र. २१९ /म-३**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ०९ नोव्हेंबर, २०२०

**संदर्भ** : १) शासन निर्णय, महसुल व वन विभाग, क्रमांक: सीएलएस-२०१५/प्र.क्र.४०/म-३, दिनांक १३.५.२०१५
२) शासन निर्णय,महसुल व वन विभाग, क्रमांक: सीएलएस-२०१७/प्र.क्र.२६७/म-३ दिनांक २५.०१.२०१८

**प्रस्तावना:**

राज्यात जून ते ऑक्टोबर,२०२० या कालावधीत विविध जिल्हयात अतिवृष्टी व पुरामुळे नुकसान झाल्याचे निर्दशनास आले आहे. या नैसर्गिक आपत्तीमुळे बाधित झालेल्या नागरिकांना मदत करण्यासंदर्भात मा.मुख्यमंत्री यांचे अध्यक्षतेखाली दिनांक २३.१०.२०२० रोजी झालेल्या बैठकीत घेतलेल्या निर्णयास दिनांक २९.१०.२०२० रोजी झालेल्या मंत्रिमंडळ बैठकीत मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार उपरोक्त आपत्तीमध्ये बाधित झालेल्या नागरिकांना मदत देण्यासाठी धोरण निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

राज्यात जून ते ऑक्टोबर, २०२० या कालावधीत विविध जिल्हयात अतिवृष्टी व पुरामुळे बाधित झालेल्या नागरिकांना मदत देण्यासंदर्भात दिनांक २९.१०.२०२० रोजी झालेल्या मंत्रिमंडळ बैठकीत घेतलेल्या निर्णयानुसार संदर्भाधीन शासन निर्णयामध्ये विहित केलेल्या बाबींसाठी सदर शासन निर्णयान्वये विहित केलेल्या दराने मदत प्रदान करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. या आपत्तीमध्ये शेतीपिकांच्या व बहुवार्षिक पिकांच्या झालेल्या नुकसानीसाठी खालील दराने मदत देण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

**शेतीपिकांच्या नुकसानीसाठी मदत**

| बाब | दयावयाची मदत | मदतीची रक्कम |
|---|---|---|
| शेतीपिकांच्या व बहुवार्षिक पिकांच्या नुकसानीसाठी मदत | जून ते ऑक्टोबर,२०२० या कालावधीत राज्यात अतिवृष्टी व पुरामुळे शेतीपिकांचे व बहुवार्षिक पिकांचे किमान ३३ % नुकसान झाले आहे अशा बाधित शेतकऱ्यांना शेतीपिकांच्या (जिरायत व आश्वासित सिंचना खालील पिके) नुकसानीसाठी रू १०,०००/- प्रति हेक्टर व बहुवार्षिक पिकांच्या नुकसानीसाठी रू २५०००/- प्रति हेक्टर या दराने २ हेक्टरच्या मर्यादेत मदत देण्यात यावी. | शासन निर्णय, दि १३.५.२०१५ नुसार दयावयाच्या मदतीसाठी राज्य आपत्ती प्रतिसाद निधी (SDRF) मधून खर्च करण्यात यावा व वाढीव दरानुसार होणारा खर्च राज्य शासनाच्या निधीमधून करण्यात यावा. |

३. शेती व बहुवार्षिक पिकांच्या नुकसानीसाठी मदतीचे वाटप करताना खालीलप्रमाणे दक्षता घेण्यात यावी.

i) प्रचलित नियमानुसार शेती / बहुवार्षिक पिकांच्या नुकसानीकरीता दयावयाची मदत ३३ टक्के अथवा त्याहून अधिक नुकसान झालेल्या प्रकरणी अनुज्ञेय राहील.

ii) प्रचलित पध्दतीनुसार कृषी सहायक, तलाठी व ग्राम सेवक यांच्या संयुक्त स्वाक्षरीने पूर्ण करण्यात आलेल्या पंचनाम्यानुसार विभागीय आयुक्त यांनी शासनास सादर केलेल्या अहवालानुसार मदतीचे वाटप जिल्हाधिकारी यांनी करावे.

iii) संबंधित बाधितांच्या बँक बचत खात्यात मदतीची रक्कम थेट जमा करण्यात यावी.

iv) कोणत्याही बाधितांना रोखीने किंवा निविष्ठा स्वरुपात मदत करण्यात येऊ नये.

v) शेत जमिनीच्या झालेल्या नुकसानीकरीता मदतीची रक्कम खातेदारांच्या बँक खात्यावर थेट जमा करताना मदतीच्या रक्कमेमधून कोणत्याही बँकेने कोणत्याही प्रकारची वसुली करु नये. याकरिता सहकार विभागाने योग्य ते आदेश निर्गमित करावेत.

vi) या शासन निर्णयानुसार देण्यात येणाऱ्या मदतीची व्दिरुक्ती होणार नाही याची सर्व जिल्हाधिकारी यांनी काटेकोरपणे खात्री केल्यानंतरच मदत प्रदान करण्याची दक्षता घ्यावी.

vi) सदर निर्णयान्वये शेतकऱ्यांना देण्यात येणारी मदत ही विशेष बाब असल्यामुळे पूर्वोदाहरण म्हणून गणली जाणार नाही.

४. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२०११०९१५१४५६५३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

KISHOR DATTATRAYA RAJENIMBALKAR

Digitally signed by KISHOR DATTATRAYA RAJENIMBALKAR
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=cf2dfdccb71bca6abd2353be7baa29cbc754393cc0286e34f8abf7a7ba656986, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=4a04516fa5d4be1307e5955daea69f94ef4417e68233d2789cddc9f41ca2cefd, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=KISHOR DATTATRAYA RAJENIMBALKAR
Date: 2020.11.09 17:42:01 +05'30'

**( किशोर राजे निंबाळकर )**
सचिव (आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन)

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,मंत्रालय,मुंबई,
२. मा. विरोधी पक्ष नेता (विधानसभा/विधान परिषद), विधानमंडळ सचिवालय,मुंबई,
३. महाराष्ट्र विधानमंडळाचे सर्व सन्माननीय विधान सभा/विधान परिषद सदस्य,
४. अपर मुख्य सचिव ( वित्त ), मंत्रालय,मुंबई,
५. अपर मुख्य सचिव (महसुल), महसुल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई
६. सचिव (कृषी), कृषी व पदुम विभाग,मंत्रालय, मुंबई
७. अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव /सचिव,सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग,मंत्रालय,मुंबई
८. सर्व विभागीय आयुक्त,
९. आयुक्त (कृषी), महाराष्ट्र राज्य, पुणे
१०. सर्व जिल्हाधिकारी,
११. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
१२. महालेखापाल (लेखा परिक्षा) १/२,महाराष्ट्र,मुंबई/नागपूर,
१३. संचालक, लेखा व कोषागारे ,मुंबई
१४. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१५. मा.मंत्री (मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई

१६. मा. राज्यमंत्री (मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
१७. वित्तिय सल्लागार व सहसचिव,मदत व पुनर्वसन प्रभाग,मंत्रालय,मुंबई
१८. कार्यासन अधिकारी (म-११), मदत व पुनर्वसन प्रभाग,मंत्रालय,मुंबई
१९. वित्त विभाग (कार्यासन व्यय-९/अर्थ-६),मंत्रालय,मुंबई
२०. निवड नस्ती (कार्यासन-म-३).